**शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संस्थेच्या नियामक मंडळावर राज्य शासनाद्वारे अध्यक्ष व सदस्यांची नियुक्ती करण्याबाबत....**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१११९/(५५/२०)/तांशि-२**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ०९ जून, २०२०**

**संदर्भ :** १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक संकीर्ण-२०१३/(१२९/१३)/तांशि-२, दिनांक २०.११.२०१८

२) शासन शुद्धीपत्रक उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक संकीर्ण-२०१३/(१२९/१३)/तांशि-२, दिनांक ३१.१२.२०१८

३) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक संकीर्ण-१११९/(०२/२०)/तांशि-२, दिनांक १०.०१.२०२०

४) मनुष्यबळ विकास मंत्रालय, भारत सरकार यांची क्रमांक F.No. १-१/२०१२(AC), दिनांक १२ .०२.२०१८ ची अधिसूचना.

५) शासन अधिसूचना उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक परिनि.२०१८/प्र.क्र. ९०/विशि-२, दिनांक १४.०१.२०१९

६) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे क्रमांक १७/तंशिसं/बीओजी/२०२०/१९, दिनांक १८.०२.२०२०

**प्रस्तावना :**

तंत्रशिक्षणाचा दर्जा सुधार कार्यक्रम(TEQIP) टप्पा १ व २ च्या अनुषंगाने स्वायत्तता प्राप्त केलेल्या राज्यात कार्यरत शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या स्वायत्त संस्थेतील नियामक मंडळावर संदर्भ क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये राज्य शासनाद्वारे अध्यक्ष आणि सदस्यांची नियुक्ती करण्यात आलेली होती. सदरच्या नियामक मंडळाचे गठण हे विद्यापीठ अनुदान आयोगाने निर्गमित केलेल्या अधिसूचनेतील तरतुदीनुसार करण्यात येते. तसेच, संदर्भ क्रमांक (१) येथील शासन निर्णयान्वये नियुक्त केलेल्या नियामक मंडळातील अध्यक्षांऐवजी संदर्भ क्रमांक (२) येथील शासन शुद्धीपत्रकाद्वारे सदर संस्थेतील नियामक मंडळाच्या अध्यक्ष पदावर नव्याने नियुक्ती करण्यात आलेली आहे.

२. उपरोक्त संदर्भ क्रमांक (१) येथे नमुद शासन निर्णयान्वये नियुक्त केलेल्या नियामक मंडळाची मुदत सन २०२० अखेर संपुष्टात येणार आहे. राज्यातील ६ शासकिय अभियांत्रिकी महाविद्यालये, २ शासन मालकिच्या १०० टक्के अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये आणि १ हॉटेल मॅनेजमेंट ॲण्ड केटरिंग टेक्नॉलॉजी महाविद्यालय यांच्या नियामक मंडळाचे (Board of Governance- BoG) सदस्य व अध्यक्ष यांची नियुक्ती करण्याची बाब विचाराधीन असल्याने संदर्भ क्रमांक (१) व (२) च्या शासन निर्णयान्वये शासकीय अभियांत्रिकी संस्थेच्या नियामक मंडळावर राज्य शासनाद्वारे नियुक्त केलेल्या सदस्यांची नियुक्ती, संदर्भ क्रमांक (३) येथील दिनांक १०.०१.२०२० च्या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात आलेली आहे.

३. मनुष्यबळ विकास मंत्रालय (विद्यापीठ अनुदान आयोग), भारत सरकार यांनी संदर्भ क्रमांक (४) येथे नमूद दिनांक १८ जानेवारी, २०१८ रोजीच्या "University Grant commission (Conferment of Autonomous Status Upon Colleges and Measures for Maintenance of Standard in Autonomous Colleges ) Regulation, २०१८" अधिसूचनेन्वये स्वायत्ततेसंबंधीची मार्गदर्शक तत्वे प्रसिद्ध केलेली आहेत. त्याअनुषंगाने, विद्यापीठ शिक्षण उपविभागाने महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ (२०१७ चा महा.६) याच्या कलम ७१ चे पोट कलम (७) तसेच कलम ७२ चे पोट- कलम (१०) आणि कलम १२२ याद्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून संलग्न महाविद्यालये, मान्यताप्राप्त परिसंस्था आणि संचालित किंवा घटक महाविद्यालये यांना स्वायत्तता देण्याबाबतचे परिनियम संदर्भ क्रमांक ५ येथे नमुद दिनांक १४ जानेवारी, २०१९ रोजी अधिसूचित केलेले आहेत. सदरचे परिनियम हे महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम २०१६ अंतर्गत जी महाविद्यालये महाराष्ट्र राज्यातील विद्यापीठांशी संलग्न आहेत किंवा ज्या मान्यता दिलेल्या परिसंस्था आहेत किंवा जी विद्यापिठाची संचलित अथवा घटक महाविद्यालये आहेत अशा संस्थांना लागू आहेत. त्याअनुषंगाने, संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी शासनास प्रस्ताव सादर केलेला आहे.

४. विद्यापीठ अनुदान आयोगाने दिनांक १८ जानेवारी, २०१८ रोजी प्रसिद्ध केलेली मार्गदर्शक तत्वे, त्याअनुषंगाने विद्यापीठ शिक्षण उपविभागाने दिनांक १४ जानेवारी, २०१९ रोजी प्रसिद्ध केलेले परिनियम यामधील तरतुदी, संदर्भाधीन शासन निर्णय आणि संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य यांनी शासनास सादर केलेला प्रस्ताव विचारात घेता, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या संस्थेच्या नियामक मंडळावर राज्य शासनाद्वारे अध्यक्ष व सदस्य यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :**

राज्यात कार्यरत शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे या स्वायत्त अभियांत्रिकी महाविद्यालयांमधील नियामक मंडळावर राज्य शासनाद्वारे नियुक्त करावयाच्या अध्यक्ष आणि सदस्यांची खालीलप्रमाणे नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे :

| अध्यक्ष/सदस्य | प्रवर्ग | नियुक्त करण्यात आलेले अध्यक्ष/सदस्य |
|---|---|---|
| अध्यक्ष | शिक्षणतज्ञ,<br>उद्योगपती,व्यावसायिक | श्री. प्रतापराव पवार<br>अध्यक्ष, सकाळ पेपर्स प्रा. लि., पुणे |
| सदस्य | शिक्षणतज्ञ,<br>उद्योगपती,व्यावसायिक | १) श्री. प्रमोद चौधरी<br>कार्यकारी अध्यक्ष, प्राज इंडस्ट्रिज लिमिटेड, पुणे<br>२) डॉ. संजय धांडे, माजी संचालक, आय.आय.टी. कानपूर |
| सदस्य | राज्य शासनाची नामनिर्देशित व्यक्ती | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई |

नियामक मंडळांच्या बैठकांसाठी तथा संस्थेच्या निगडीत अन्य कामकाजासाठी नियामक मंडळाचे अध्यक्ष तथा सदस्य यांना महाराष्ट्र राज्याच्या सचिव स्तरावरील अधिका-यास देय असणा-या प्रवासाच्या सवलती, प्रवास भत्ता व बैठकभत्ता देय राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६०९१६५५१३७८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Satish Jagdeorao Tidke

Digitally signed by Satish Jagdeorao Tidke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=abbed596652773468508d937a99472988ebdda28db8c543b79abe527c99646f6, cn=Satish Jagdeorao Tidke
Date: 2020.06.09 17:19:22 +05'30'

**(सतिश ज. तिडके)**
उपसचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. अध्यक्ष, विधान सभा, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
५. मा. मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१०. मा. सचिव, मनुष्यबळ विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
११. मा. सचिव, आर्थिक कार्य विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली.
१२. मा. सचिव, विद्यापीठ अनुदान आयोग, नवी दिल्ली.
१३. मा.अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग
१४. संचालक, राष्ट्रीय परियोजना कार्यान्वयन एकक, एडसिल हाऊस, चतुर्थ तल, १८ अे, सेक्टर १६-ए, नोएडा (उ.प्र)
१५. संचालक, अखिल भारतीय तंत्र शिक्षा परिषद, नवी दिल्ली
१६. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. संचालक, वीरमाता जिजाबाई टेक्निकल इन्स्टिटयूट, माटुंगा, मुंबई,
१८. संचालक, अभियांत्रिकी महाविद्यालय, पुणे
१९. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, कराड
२०. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, जळगाव
२१. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, चंद्रपूर
२२. प्राचार्य, शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, अमरावती
२३. सर्व विभागीय सहसंचालक, तंत्रशिक्षण
२४. प्राचार्य, सर्व शासकीय अनुदानित अभियांत्रिकी महाविद्यालये
२५. प्राचार्य, सर्व शासकीय अनुदानित तंत्रनिकेतने

२६. सर्व विभागीय सहसंचालक, तंत्रशिक्षण
२७. सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई
२८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
२९. महालेखापाल (लेखापरीक्षा ) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
३०. अधिदान व लेखा अधिकारी मुंबई/ निवासी लेखा परीक्षा अधिकारी
३१. कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रशास्त्र विद्यापिठ, लोणेरे, रसायन तंत्रज्ञान संस्था, माटुंगा कुलसचिव,सर्व विद्यापीठे
३२. उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व कार्यासने
३३. महासंचालक, माहिती व जनसंपर्क मंत्रालय, मुंबई
३४. अवर सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
३५. निवड नस्ती - तांशि-२